राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत
सन २०१०-११ मध्ये गतिमान
कडधान्य उत्पादन कार्यक्रम
राबविण्यास प्रशासकीय मान्यता
देण्याबाबत....................

महाराष्ट्र शासन
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय-असुअ-२०१०/प्र.क्र. ८०/राकृवियो कक्ष
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २१ जून,२०१०

वाचा :- १) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक-सीपीएस ५-१९/२०१० -एनएफएसएम दि. २६ एप्रिल,२०१०
२) आयुक्त (कृषि) यांचे पत्र क्रमांक- कृआ/विप्र-२/गति कड/राअसुअ/प्र.मंजुरी/प्र.क्र./२९४/१० दिनांक १७ जून,२०१०

**शासन निर्णय** :-

कृषि विकास दरात वाढ करणे, अन्नधान्याच्या उत्पादनाचा वेग लोकसंख्या वाढीच्या प्रमाणात राखण्याकरिता केंद्र शासनाने ११ व्या पंचवार्षिक योजनेच्या कालावधीत राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान हा कार्यक्रम राबविण्याकरिता निर्णय घेतला आहे. त्यानुसार राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान कार्यक्रम सन २००७-०८ पासून राज्यात राबविला जात आहे. या कार्यक्रमांतर्गत कडधान्याच्या उत्पादन व उत्पादकतेत वाढ करण्याकरिता केंद्र शासनाने उपरोक्त क्रमांक-१ येथील दिनांक २६ एप्रिल,२०१० च्या पत्रान्वये गतिमान कडधान्य उत्पादन कार्यक्रम (Accelerated Pulses Production Programme) राबविण्यास मान्यता दिलेली आहे. या योजनेंतर्गत राज्यातील शेतकऱ्यांना सुधारित तंत्रज्ञान व व्यवस्थापनाद्वारे कडधान्याच्या उत्पादनात व उत्पादकतेत विस्तार सेवेच्या माध्यमातून वाढ करण्याकरिता सन २०१०-११ पासून हा कार्यक्रम २१ जिल्हयांतील ८८ गटात राबविला जाणार आहे. हा कार्यक्रम ८८००० हेक्टर क्षेत्रावर राबविण्यात येणार असून, शेतकऱ्यांना १०० टक्केअनुदान तत्वावर निविष्ठांचा पुरवठा केला जाणार आहे. आयुक्त कृषि यांनी उपरोक्त क्रमांक २ येथील पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील **"राज्य अन्न सुरक्षा अभियान कार्यकारी समिती"** च्या दि. ३ मे,२०१० च्या बैठकीत मान्यता देण्यात आलेली आहे.

२. या कार्यक्रमांतर्गत आयुक्त (कृषि) यांनी सन २०१०-११ करिता रु.४३३८.३० लक्ष इतक्या निधीचा कार्यक्रम प्रस्तावित केला आहे. तथापि, केंद्र शासनाकडून या कार्यक्रमाकरिता रु. ४३१८.१४ लक्ष इतका निधी मंजूर केलेला असल्याने केंद्र शासनाने मंजूर केलेल्या निधीच्या मर्यादेत (निविष्ठासाठी रु.४२६६.०० लक्ष व तंत्र सहाय्य व वाहतूक भत्ता याकरिता रु.५२.१४ लक्ष) खालील बाबींना व हा कार्यक्रम राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

(रुपये लाखात)

| अ.क्र. | पीक | गटसंख्या | क्षेत्र ( हेक्टर) | लागणारे अनुदान | | तंत्र सहाय्यक व वाहतूक भत्यासाठी प्रत्येकी रु.६६,००० प्रमाणे अनुदान | एकूण अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | प्रतिहेक्टर अनुदान | एकूण अनुदान | | |
| १ | तूर | ६० | ६०,००० | ५,०३५.१८ | ३,०२१.११ | ३९.६ | ३,०६०.७१ |
| २ | मूग | १७ | १७,००० | ४,४६८.५८ | ७५९.६६ | ११.२२ | ७७०.८८ |
| ३ | उडिद | ११ | ११,००० | ४,५४०.४५ | ४९९.४५ | ७.२६ | ५०६.७१ |
| | | **८८** | **८८,०००** | | **४,२८०.२२** | **५८.०८** | **४,३३८.३** |

३.	या योजनेच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहे.

१. केंद्र शासनाकडून वितरित करण्यात येणारी रक्कम केंद्र शासनाच्या सूचना व उपरोक्त दिनांक १७/६/२०१० च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावातील बाबी विचारात घेवून खर्च करण्यात यावी.

२. या योजनेकरिता विहित करण्यात आलेल्या भौतिक लक्षांनुसार निधी खर्च करण्यात यावा.

३. केंद्र शासनाने विहित केलेल्या मार्गदर्शक सूचनांच्या अनुषंगाने या कार्यक्रमाची अंमलबजावणी करावी.

४. या योजनेचा भौतिक व वित्तीय प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत केंद्र शासनाला व या विभागास सादर करावा.

५. या योजनेच्या संदर्भात विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास व या विभागास सादर करावे.

६. या योजनेकरिता प्राप्त होणारा निधी आणि त्याचा खर्च याचे लेखा विहित नमुन्यात ठेवण्यात यावेत. तसेच त्याचे लेखा परिक्षण सनदी लेखापालांकडून करुन घ्यावे व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावरुन उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१००६२२१७५६५२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(ग. शा. सोनावणे)
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,
प्रधान सचिव (उर्जा), उद्योग, उर्जा व कामगार विभाग,
सचिव, पाटबंधारे विभाग, मंत्रालय, मुंबई
आयुक्त (कृषि) कृषि आयुक्तालय, माहाराष्ट्र राज्य, पुणे
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य छोटया शेतकऱ्यांचा कृषि व्यापार संघ, पुणे
कुलगुरु, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला, जिल्हा-अकोला,
कुलगुरु, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा-अहमदनगर
कुलगुरु, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा-रत्नागिरी
कुलगुरु, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी, जिल्हा-परभणी
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी ,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व विभागीय कृषि सहसंचालक
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
मुख्यसचिव, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहायक
प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग यांचे स्वीय सहायक
सहसचिव / सर्व उप सचिव/ अवर सचिव /कार्यासन अधिकारी, (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती